सन २०२५-२६ या आर्थिक वर्षातील ग्रामपंचायत कर्मचाऱ्यांच्या वेतन व सरपंच,उपसरपंच यांचे मानधन व सदस्य बैठक भत्ता तसेच ग्रामपंचायत कर्मचारी भविष्य निर्वाह निधी यासाठी शासन सहायक अनुदान हिस्सा वितरीत करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः व्हीपीएम २०२५/प्र.क्र. १०४/पंरा-३
बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ फोर्ट, मुंबई - ४०० ००१.
तारीख: १३ जून,२०२५.

**वाचा :-** १) शासन निर्णय क्रमांक व्हीपीएम-२०१७/प्र.क्र.२७/पंरा-३, दि.६.१.२०१८.
२) शासन निर्णय क्रमांक व्हीपीएम-२०१९/प्र.क्र.२५५/पंरा-३, दि. १४ ऑगस्ट, २०१९.
३) शासन पत्र क्रमांक व्हीपीएम-२०२४/प्र.क्र.१०२/पंरा-३, दि.१.८.२०२४.
४) शासन निर्णय क्रमांक व्हीपीएम-२०२४/प्र.क्र.२५०/पंरा-३, दि.१०.०२ .२०२५ व दि.२२.०५ .२०२५.

**शासन निर्णय :-**

सन २०२५-२६ या आर्थिक वर्षामध्ये ग्रामपंचायत कर्मचाऱ्यांच्या वेतन व भविष्य निर्वाह निधी तसेच ग्रामपंचायत सरपंच/उपसरपंच यांच्या मानधन , सदस्य बैठक भत्ता इ. अदा करण्यासाठी मागणी क्रमांक एल-२, २०५३-जिल्हा प्रशासन (०७) (०१) ग्रामपंचायतीचे सरपंच व सदस्य यांचे मानधन व इतर भत्ते आणि कर्मचाऱ्यांचे किमान वेतन यासाठी अनुदान -३१ - सहायक अनुदान (२०५३ १०४२) (वेतनेतर) या लेखाशीर्षाखाली वित्त विभागाने अर्थसंकल्पीय तरतूद **रु.८२०.५६ कोटी** ( रुपये आठशे वीस कोटी छप्पन लाख फक्त ) मंजूर केली आहे. त्यापैकी वित्त विभागाने **रु.२०५.१४ कोटी** इतका निधी माहे एप्रिल, मे, व जून या तीन महिन्यांचा खर्च भागविण्यासाठी विभागास उपलब्ध करुन दिला आहे. सदर निधी संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष, पंचायत राज, पुणे यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

२. सन २०२५-२६ या आर्थिक वर्षात मागणी क्रमांक एल-२, प्रधानशीर्ष - २०५३ - जिल्हा प्रशासन - ०७ - मानधन व इतर भत्ते यासाठी अनुदाने - (०७) (०१) - ग्रामपंचायतीचे सरपंच, सदस्य यांचे मानधन व इतर भत्ते आणि कर्मचाऱ्यांचे किमान वेतन यासाठी अनुदाने (२०५३ १०४२) वेतनेतर, ३१ - सहायक अनुदाने अंतर्गत माहे एप्रिल,मे व जून या कालावधीतील ग्रामपंचायत कर्मचा-यांचे वेतन,सरपंच, उपसरपंच यांचे मानधन व सदस्य बैठक भत्ता , ग्रामपंचायत कर्मचाऱ्यांचे भविष्य निर्वाह निधी रक्कम अदा करण्यासाठी सहाय्यक अनुदान रक्कम रु. रु.२०५,१४,००,०००/-( रुपये दोनशे पाच कोटी चौदा लाख फक्त ) इतका निधी वितरीत व खर्च करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे..

३. या विभागाच्या शासन निर्णय क्रमांक व्हीपीएम-२०१७/प्र.क्र.२७/पंरा-३, दिनांक ६ जानेवारी, २०१८ अन्वये राज्यातील ग्रामपंचायत कर्मचाऱ्यांचे किमान वेतन तसेच शासन निर्णय क्रमांक व्हीपीएम-२०१९/प्र.क्र.२५५/पंरा-३, दि. १४ ऑगस्ट, २०१९ अन्वये सरपंच, उपसरपंच यांचे मानधन व सदस्य बैठक भत्ता थेट त्यांच्या बँक खात्यात जमा करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. तथापी, सदर सहायक अनुदान अदा करण्यासाठी विकसित केलेल्या ERP प्रणाली सद्य:स्थितीत बंद असल्याने, सदर ERP प्रणाली पूर्वीप्रमाणे सुरळीत होईपर्यन्त , सहायक अनुदान जिल्हा परिषद यांना वितरीत करुन, जिल्हा परिषदेमार्फत संबधितंना अदा करण्यास संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष, पंचायत राज, पुणे यांना संदर्भ क्रमांक ३ येथील पत्रान्वये मान्यता देण्यात आली आहे.

४ . संदर्भ क्रमांक ४ येथील शासन निर्णयानुसार वरील रक्कम खर्च करण्यासठी संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष, पंचायत राज, पुणे हे नियंत्रण अधिकारी तसेच उपसंचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष, पंचायत राज, पुणे हे आहरण व सविंतरण अधिकारी राहतील.

५. संबंधित आहरण व संवितरण अधिकारी, उपसंचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष, पंचायत राज, पुणे यांनी अर्थसंकल्पीय प्रणालीवर निधी प्राप्त झाल्यानंतर ज्या प्रयोजनार्थ निधी वितरीत करण्यात आला आहे, त्या प्रयोजनार्थ खर्च करावा. सदर निधी खर्च झाल्यानंतर त्याबाबतचे खर्चाचे विवरण व उपयोगिता प्रमाणपत्र न चुकता शासनास सादर करावे. तसेच सदर निधी पुर्ण खर्च झाल्याबाबत नियंत्रक अधिका-यांच्या प्रमाणपत्रासह पुढील निधी मागणीबाबतचा प्रस्ताव शासनास सादर करावा.

६. उपरोक्त आर्थिक वर्षातील खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे आहरण व संवितरण अधिकारी यांनी तपासण्याच्या अधीन राहून निधी खर्च करण्याची जबाबदारी नियंत्रक अधिकाऱ्यांची राहील. तसेच, वित्तीय नियमावली, महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका यानुसार वेळोवेळी वित्त विभागाने निर्गमित केलेल्या अटी व शर्तीनुसार सदर निधी खर्च करुन कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही, याची दक्षता घेण्याची जबाबदारी संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष, पुणे यांची राहील.

७. सदर खर्च मागणी क्रमांक एल-२, २०५३- जिल्हा प्रशासन (०७) मानधन व इतर भत्ते यासाठी अनुदाने (०७)(०१) ग्रामपंचायतीचे सरपंच, सदस्य यांचे मानधन व इतर भत्ते आणि कर्मचाऱ्यांचे किमान वेतन यासाठी अनुदान (अनिवार्य)-३१, सहायक अनुदाने (२०५३ १०४२) (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली सन २०२५-२६ या अर्थिक वर्षात मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा. सदर सहायक अनुदान (वेतनेतर) हे सशर्त स्वरुपाचे आहे.

८. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक UOR.३७८/EXP.१५/Date.३०.०५.२०२५ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या wwwmaharashtragov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्यांचा संगणक संकेतांक 202506131151188320 असा आहेहा आदेश डिजिटल स्वाक्षरीने . .साक्षांकित करुन काढण्यात येत आहे

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे अदेशानुसार व नावाने,

VINOD SHESHRAO BONDRE

Digitally signed by VINOD SHESHRAO BONDRE
DN: c=IN, o=STATE HEALTH ASSURANCE SOCIETY, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT., 2.5.4.20=4bd97b779f6f1e9e61491311a06aac663b01b00963f2e754c6ee2d5f7c14953d, postalCode=400018, st=Maharashtra, serialNumber=C313A8B86D67716D182C41D1E22F57D99C8EE5F4654A216D8FE23B5AD24ED271, cn=VINOD SHESHRAO BONDRE
Date: 2025.06.13 14:22:21 +05'30'

( विनोद बोंदरे )
उप सचिव , महाराष्ट्र शासन

**प्रति,**

**आहरण व संवितरण अधिकारी, उप संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष, पंचायत राज, पुणे.**

**प्रत माहिती व योग्य त्या कार्यवाहीस्तव रवाना :-**

१) स्वीय सहायक, प्रधान सचिव (ग्राम विकास व पं.रा.), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
२) सह सचिव/ उप सचिव (पंरा/आस्था/वित्त), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष, पंचायत राज, महाराष्ट्र राज्य,पुणे.
४) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र , मुंबई/नागपूर
६) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
७) सर्व मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
९) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई